**उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर यांच्या अधिपत्याखालील जिल्हा परिषदेकडील प्राथमिक आरोग्य केंद्रातील ४५४ अस्थाई पदे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक- जिरुप २३१०/प्र.क्र. ११४/आरोग्य-३
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २ फेब्रुवारी, २०११.

**वाचा :** १) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, समक्रमांक, दिनांक २०.१०.२०१०.

**<u>शासन निर्णय :</u>**

उपरोक्त शासन निर्णयान्वये नागपूर, चंद्रपूर, वर्धा, गडचिरोली, भंडारा व गोंदिया या ६ जिल्ह्यांतील जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषदेकडील प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी गट-अ ची एकूण ४५४ अस्थाई पदे दिनांक ३१.१२.२०१० पर्यंत पुढे चालू ठेवण्यात आली होती. **सदर पदांचे स्थायीकरण करण्याची कार्यवाही शासनस्तरावर सुरु आहे. ही कार्यवाही अद्याप पूर्ण झाली नसल्याने विचाराधीन** नागपूर, चंद्रपूर, वर्धा, गडचिरोली, भंडारा व गोंदिया या ६ जिल्हयातील जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषदेकडील प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी गट-अ, एकूण ४५४ अस्थाई पदे दिनांक १.१.२०११ ते दिनांक २८.२.२०११ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१०-२०११ या वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**<u>मागणी क्रमांक - आर - १</u>**

" २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य.
०६ - सार्वजनिक आरोग्य
००१ - संचालन व प्रशासन
००१(चार) - गट वैद्यकीय अधिकारी (२२१० ०३७१)"

३. हा निर्णय वित्त विभागाच्या क्रमांक- असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ४ ऑक्टोबर, २००४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक- २०११०२०३१८५९२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( सुहास रा. चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

संचालक, आरोग्य सेवा,मुंबई.
सहसंचालक, आरोग्य सेवा (प्रा. आ. कें. जिल्हास्तर) मुंबई /
सहसंचालक, आरोग्य सेवा (आरोग्य) पुणे.
उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर.
जिल्हा शल्य चिकित्सक, नागपूर /चंद्रपूर /वर्धा /गडचिरोली /भंडारा /गोंदिया
जिल्हा आरोग्य अधिकारी, नागपूर /चंद्रपूर /वर्धा /गडचिरोली /भंडारा /गोंदिया
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर /चंद्रपूर /वर्धा /गडचिरोली /भंडारा /गोंदिया
वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी, सेवा-२, सेवा-३, सेवा-५, अर्थसंकल्प, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (आरोग्य-३)